नेटाक्षरी आणि ई-साहित्याचा व्याप वाढतच चाललाय आणि तो व्याप सांभाळायला हातही पुढे येताहेत. त्यातलाच एक **शशिकांत रणवरे** आजच्या अंकाचा संपादक.

नेटाक्षरीच्या पहिल्या अंकातली पहिली ओळ होती “आजच्या काळात कवितेला वाहिलेल साप्ताहिक काढण म्हणजे मुर्खपणा आहे आणि आम्ही ते करायच ठरवल आहे” या वाक्याला कवीवर्य मंगेश पाडगावकरांनी दिलेली मनसोक्त टाळी आजही आठवली की रोमांच उभे रहातात तेव्हा हा प्रयोग किती महिने चालेल असा प्रश्न होता पण हा प्रयोग यशस्वी व्हावा ही श्रींची इच्छा असावी आणि लखो मराठी रसिंकांची दाद घेत नेटाक्षरी आता शंभराव्या अंकापाशी पोहोचले सुद्धा अर्थातच हे एकट्यादुकट्याच कामच नव्हत. चारशे कवींचा दमदार जगभर पसरलेला ग्रुप आणि शंभरावर उत्साही कार्यकर्त्यांच्या सपोर्ट मुळेच हे शक्य झालं. दिंडी पुढे सरकत राहिली आणि नवनवीन वारकरी येत राहिले त्यातलाच एक **शशिकांत रणवरे.**



शशिकांत कविता करायचा अगदी सातवीत असल्यापासुन पण कुठे सादर बिदर करायच्या भानगडीत पडला नव्हता. समव्यसनी मंडळी भेटलीच नव्हती म्हणा ना. अखिल भारतीय सहित्य सम्मेलनाच्या मांडवात गाठ पडली . छत्तीस गुण जमले. आम्ही बिघडलो तुम्ही बिघडा ना झालं  आणि शशिकांत आमच्यातला कधी झाला ते कळलच नाही. आधी एकदा अतिथी संपादक म्हणून जबाबदारी घेऊन त्याने स्वतःची झलक दाखवली. नवीन वर्षाच्या संकल्पाच्या कवितांचा एक संग्रह त्याने सादर केला त्याला जबरदस्त  प्रतिसाद मिळाला आणि त्याचा आत्मविश्वास दुणावला. त्याने नेटाक्षरीचा रेग्युलर संपादक व्हायच ठरवलय. नेटाक्षरीचा एक नियम आहे, नविन येणाऱ्याने जुन्या वाटेला जायच नाही. नवीन रस्ता शोधायचा. कोलंबस बनुन जंप घ्याची काळोखात . नाहीतरी घालवायला काय आहे? शशिकांत कडुन खुप अपेक्षा आहेत. त्याने जुन्याचं ओझ फेकुन नवीन वाट धुंडाळावी. नवा प्रकाश दाखवावा. त्याच्या नावात शशिकांत आहेच. त्याने मराठीच काव्यविश्व उजळुन निघाव. लख लख चंदेरी तेजाच्या दुनियेत झळाळत्या कोटींज्योतींच दर्शन घडवाव.




**टिम नेटाक्षरी**

# संपादकीय...

नमस्कार मंडळी

एक कटिंग चाय तुमच्या समोर घेउन येताना खुप आनंद होत आहे. एक कटिंग चाय म्हणजे अस्सल मुबईकरांसाठी नुसतीच एक कटिंग, खरतर एका प्रकारच टॉनिकच. दमलेल्या थकलेल्या जीवाची हि रोजची साबतीन. याच कटिंग च्या एका एका घोटा सोबत आपण काय काय गोष्टी ठरवतो, रिचवतो, घडवतो, बिघडवतो बरच काही करतो. कधी टिंगल टवाळी थट्टा मस्करी तर कधी फ़ुल टु असलेल टेन्शन या कटिंग चाय बरोबर आपण बर्यचदा उडवून लावल आहे. वडापाव, सिगरेट अणि एक कटिंग चाय या त्रिकुटाने अनेकांची भुक शमवली आहे. रिमझिम पाऊस, सोबत जिवलग मित्र (किंवा कधी ती तर कधी तिची आठवण), गरमा गरम भजी आणि एक स्पेशल कटिंग हे समिकरण आपल्या सर्वानां काही नविन नाही. या कटिंग च्या प्रेमात कोण कोण पडेल काही सांगता येत नाही.



ठाणे येथे भरलेल्या ८४व्या अखिल भारतीय मराठी साहित्य सम्मेलन अध्यक्ष श्री. उत्तम काबळे यांनीही सम्मेलना दरम्यानच्या आपल्या वास्तव्यात अर्धांगिनी सोबत टपरीवरच्या कटिंग चहाचा आस्वाद घेतल्याचे आभार प्रदर्शनाच्या भाषणात सांगितले आहे.नाक्या नाक्या वरील चहाच्या टप-या आणि तिथली माणसांची तुडुंब गर्दी हा खरतर स्वतंत्र संशोधनाचा विषय होऊ शकतो. या कटिंगच आणि आपल खरं सुत जमतं ते कॉलेजला असताना. कॉलेजला असतानाच या टपरीवर जिव जडु लागतो. अख्खी तरुणाई त्या टपरीवर आणि एका कटिंग वर जिव ओवळुन टाकत असते.पोरीची लफ़डी , सिनियर जुनियर मधली टशन,परिक्षेच टेन्शन या सगळयावर बहुदा एक कटिंग चाय हाच एक उतारा असतो. क्रिकेट, सिनेमा,राजकारण असे अनेक विषय इथे एका हातात कटिंग नाचवत तर दुसरया हातात सिगरेट लपवत चघळले जातात. अनेक कवी लेखकांची तर हि अगदी जवळची सोबतीण आहे.



बरयाचदा या कटिंगच्या घोटा सोबत कोणाला आपलं पहिल प्रेम प्रकरण सांगायच असत तर कोणाला आपण आणखी एका लफड्यातुन कसे सुखरुप सुटलो हे सांगायच असत तर आणखी कोणाला बायकोची सहन न होणारी कटकट सांगायची असते. कोणीतरी आयुष्याला शिव्या देत देत दोन चार कटिंग रिचवतो तर कोणी नुकत्याच वाढलेल्या पगाराची पार्टी म्हणुन सगळयांना हवी तेवढी प्या अस म्हणत खिजवत असतो . सगळयांची कारण अनेक पण जागा एकच आणि ती कटिंग सुध्दा एकच या कटिंग मध्ये बरच काही लपलं आहे. सगळच काही आता सुचत नाही, एक कटिंग मला ही घ्यावी लागेल बहुदा तुम्ही पुढच्या कवितांची मजा घ्या मी आलोच एक कटिंग घेऊन.......


**शशिकांत रणवरे**

संपादक

मुंबई

# एक कटिंग चाय संपादकाची...



एक कटिंग चाय
और तेरी याद
कधी केशरी पहाट फुलती
कधी रात्र विराण सलती

एक कटिंग चाय
और तेरी याद
कधी उनाड अल्लड वारा
कधी रिमझिम श्रावण धारा

एक कटिंग चाय
और तेरी याद
कधी बावर द्विधा मन
कधी हलके हसरे क्षण

एक कटिंग चाय
और तेरी याद
कधी प्राजक्त सडा सुगंध
कधी उगा स्वैर बेछुट बेधुंद

एक कटिंग चाय
और तेरी याद
कधी क्षणभर ओल दवाची
कधी ओंजळ गंधीत रंगांची

एक कटिंग चाय
और तेरी याद
कधी तिच नसुन सगळयात असण
कधी मिस्किल गुढ हसणं

**शशिकांत रणवरे**
संपादक
मुंबई

# शेवटची एक कटींग चाय

ह्या शहरातली आज
शेवटची रात्र
उद्या नवे शहर
नवी पहाट

येताना काहीचं नव्हत
सोबत आणलेल
जाताना ही नसेल
आठवणीं शिवाय

इथले घालवलेले दिवस
उलगडलेल्या रात्री
अवचित भेटलेले मैतर
मनातील प्रिती

ठरवलय घट्ट मनाशी
आठवायचं नाही
जिवाला घोर लावून
उसासायच नाही

सगळं विसरीनही कदाचित
माहित नाही
पुन्हा जुळतीलही कदाचित
नविन ऋणानुबंध
.
पण सतत आठवत राहिल
आपल्या कट्ट्यावरची
तुझ्या सोबत प्यायलेली
एक कटींग चाय!!

**सोनाली घाटपांडे**
पुणे



# टपरीवरती

डोक्याची भणभण
भरकटलेली संध्याकाळ
खुळचटलेले विचार
क्षणा क्षणाला कुरतडत जाणार
एकटेपण
सोबत ???
एक कटिंग चाय

तिचा प्रश्न
“बरा आहेस ना ?”
त्यांचा प्रश्न
“कसा आहेस ?”
माझा प्रश्न
“आहेस ??”
उत्तर....
एक कटिंग चाय

तुकारामांची गाथा
शेक्सपियरचं हॅम्लेट
न्युटनचे मोशन्स लॉ
डार्विनची उत्क्रांती
आमच्या आयुष्याच
‘मसाला ऑम्लेट’
स्वीट डिश
एक कटिंग चाय



रिकामा इनबॉक्स
आउट्गोइंग बंद
No Missed calls
रिकामी फोनबुक
१००० मिस्स्ड मोमेंट्स
*123#
बॅलेन्स
एक कटिंग चाय

जर हे असं झालं असतं
तर ते असं झालं नसतं
किंवा झालं असतंही
किवा वेगळं काही झालं असतं
जर तर चे हिशोब
किंतु किंवा चे पर्याय
वजाबाकीतला
हातचा
एक कटिंग चाय

डोक्यामध्ये विचार जास्त
की ग्लासमध्ये चहा ?
ग्लासातला चहा डोक्यात
डोक्यातले विचार ग्लासात
चहा गरम  विचार थंड
चहा थंड विचार गरम
पुन्हा एकदा
एक कटिंग चाय

**आनंद माने**
सोलापूर

# खळगी



मध्यावर सुर्य घेउन
दिवस सरतो  आणि रात्र
गारठलेला देह  चिमण्यांच्या ऊबेसाठी
पदरातल्या ठीगळांसाठी
पोटांच्या खळग्यांसाठी
कोणी तरी ओरबडत असतो स्वतःला
दिवस रात्र!!!
आणि टोकांच्या घावांनी आपल्या वेदना
मांडायच्या तरी कुठे ?
त्या फक्त झेलायच्या !
आणि तो झेलतोही आभाळकडे पाहत
दयेसाठी ? नाही
धिक्कार म्हणुन!
ते घाव
मात्र कधी झरतात कधी मरतात
पण कधी भरत नाहीत
भरतात ती डोळयाची खळगी
पण पोटातली आग विझतेय कुठे ?
ती भडकत जाते
खिसे चाचपडत अखेर तो
जवळच्या टाकीकडे वळतो
आणि ओततो घशात पोटभर पाणी !!!
कदाचित आग  विझेल
कदाचित विझणार नाय
पण इतकी कशी महाग झाली ?
एक कटिंग चाय !!

**सुधीर मुळीक**
मुंबई

# जखम



ऐटित उचलावा कप
अन लावावा ओठांना
अन सर्रकन घ्यावा एक घोट
-------अन चटका बसावा जिभेला
तसा तुझा तो अश्रू
सार काही आलबेल असण्याचा खुणा धुवुन
माझ्या डोळयांची झोप अडवणारा
दगडच समजत होतो आजवर
रफ अन टफ
एका घावात दोन तुकडे
करण्याची तुझी तऱ्हा
इतकी वरवरची असेल ?
मान खाली घातली अन
पुन्हा कप ओठाला लावला
थांबायला हवं होतं
पहिल्या घोटालाच
..
...
जिभेला मलम नसतं कोणतंच
आणि जिभेने केलेल्या जखमेलाही

**नाम गुम जायेगा**
ठाणे

# तलफ



फ़ाईलचे ढिगारे उपसता उपसता
कम्प्युटरचा की-बोर्ड बडवता बडवता
डोके होता जड जरासे
डोळे होता मंद जरासे
नको सिगरेट
नको मधुशाला
हवा मजला एक कटिंग़ चहा रे
एक कटिंग़ चहा

श्वासा श्वासात जो पेरी ताजगी
आठवणींची जो जोडी साखळी
जाऊन येईन मी गांवच्या पारावर
बसेन निवांत कॉलेज कॅंटिनातल्या
बाकड्यावर
कटिंग चहाशी जिथे जुळले नाते
जिथे लाभले मैत्र जीवाचे

घडल्या जिथे वादळी चर्चा
कळल्या जिथे गुलाबी वार्ता

जिथे रचले स्वप्नांचे मनोरे
जिथे आखले कित्येक मनसुबे
नशा नव्हती त्यात काही
वेलची होती हिरवी हिरवी
गंध होता रंग होता
वाफ़ेमध्ये सुगंध होता



यार , चहा तो होता अस्सल
नव्हती नक्कल

सुटले गांव
कॉलेज संपले
कटींग चहाचे कपच फ़ुटले
पण आजही आहे मी चहा शौकीन

पण

खडूस बॉस आणि बेचव चहा मशीन
माझी तलफ़ काही मिटत नाही
(यारो, चांगली कंपनी नसेल तर चढत नाही..)

म्हणूनच....

**स्वप्ना कोल्हे**
नाशिक



# वॉटर पेंटिंग

किती तरी वेळा रिचवलेत

घोट घोट कटिंग

हटकुन आठवते ती फुंकर

वाफभर चष्मा

आणि तु

.

.

.

वॉटर पेंटिंग

**प्राजक्त देशमुख**

नाशिक

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय. आमच्या रसिक वाचकांच्या ह्याच उत्स्फ़ुर्त प्रतिसादामुळे नेटाक्षरीने मागल्याच आठवड्यात नाबाद ८५चा पल्ला गाठला. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ८०००० हून अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फ़ॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

---

## ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य ई-साप्ताहिके

ई-स्टाप, स्वरनेटाक्षरी ऑडियो अल्बम, बालनेटाक्षरी

## प्रसिद्ध झालेली ई-पुस्तके

टल्लीची शाळा, मकरंदच्या त्रिवेण्या, ग्रेव्हयार्ड लिटरेचर, चार क्षण, तो आणि ती, प्रियेचे अभंग, देशी दारुचे दुकान-३D, ई-शाळा, तो, मी आणि सिगरेट, मोरया, लोकल गोष्टी, मीरा अनुवाद, ओथंब, सावळ्या मुलीची गाणी, सईची वही

---

वरील ई-बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

**esahity@gmail.com**

नेटाक्षरीचा हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी व सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

**netaksharee@gmail.com**

आता ई-साहित्यची वरील सर्व ई-प्रकाशन उपलब्ध आहेत सी डी मध्ये

**संपर्क करा ९८६९६७४८२०**

